"सहायक कक्ष अधिकारी" मर्यादित विभागीय स्पर्धा परीक्षा-२०१५ मधील शिफारसप्राप्त उमेदवारांचे मंत्रालयीन विभागात नियतवाटप

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन आदेश क्रमांक : मविप १४१६/प्र.क्र. ९१/१४-अ,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०५ जानेवारी, २०१७

वाचा:-समक्रमांक दिनांक २९.६.२०१६ चे आदेश

## आदेश

मंत्रालयीन विभागातील लिपिक, लिपिक-टंकलेखक, टंकलेखक यांची सहायक कक्ष अधिकारी पदावर निवडीने नियुक्ती करण्याकरीता दिनांक ३१.१.२०१६ रोजी घेण्यात आलेल्या सहायक कक्ष अधिकारी मर्यादित विभागीय स्पर्धा परीक्षा-२०१५ मधून महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने एकूण ५६ उमेदवारांची मंत्रालयीन विभागातील सहायक कक्ष अधिकारी पदावर निवडीने नियुक्ती करण्याकरीता शिफारस केली होती. त्यापैकी निवडीने नियुक्ती करण्यासाठी विहित अटी व शर्तीची पूर्तता करणाऱ्या ५२ उमेदवारांचे मंत्रालयीन विभागात संदर्भाकित दिनांक २९.६.२०१६ च्या आदेशान्वये नियतवाटप करण्यात आहे आहे.

उर्वरित ४ उमेदवारांपैकी श्रीमती नि.ब. कुलकर्णी (आताचे नांव श्रीमती नि.ल.चिमोटे), कौशल्य विकास व उद्योजकता विभाग यांच्याविरुध्द विभागीय चौकशी चालू असल्यामुळे त्यांच्या पदस्थापनेबाबत निर्णय घेण्यात आला नव्हता. आता, कौशल्य विकास व उद्योजकता विभागाने दिनांक २६.१२.२०१६ च्या आदेशान्वये श्रीमती कुलकर्णी, लिपिक-टंकलेखक यांच्याविरुध्द सुरु असलेल्या विभागीय चौकशीतून त्यांच्यावर ठेवण्यात आलेल्या दोषारोपातून त्यांना दोषमुक्त केल्यामुळे त्यांची सहायक कक्ष अधिकारी पदावर खालील प्रमाणे पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र. | श्री/ श्रीमती | लिपिक-टंकलेखकाचे नांव | गुणवत्ता क्रमांक | परीक्षेचे वर्ष | मलोआने ज्या प्रवर्गातून शिफारस केली तो प्रवर्ग | कर्मचाऱ्याचा जाती प्रवर्ग | सध्याचा विभाग | पदस्थापनेचा विभाग |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
| १ | श्रीमती | निलिमा लक्ष्मीकांत चिमोटे (नि.ब.कुलकर्णी) | ३७ | २०१५ | खुला | खुला | कौशल्य विकास व उद्योजकता विभाग | सामान्य प्रशासन विभाग |

२.    श्रीमती नि.ल. चिमोटे (नि.ब.कुलकर्णी) यांनी सदर नियुक्तीचा स्वीकार या आदेशाच्या तारखेपासून **सात दिवसांत** करावा. संबंधित मंत्रालयीन विभागांना विनंती करण्यात येते की, श्रीमती चिमोटे यांचे कार्यमुक्तीचे/नेमणूकीचे आदेश तात्काळ निर्गमित करावेत.

३.    श्रीमती चिमोटे यांनी विहित मुदतीत नियुक्तीचा स्विकार केल्यास त्यांची ज्येष्ठता संदर्भाधिन आदेशाच्या तारखेपासून धरण्यात येईल व त्यांची आपापसातील ज्येष्ठता त्यांच्या गुणवत्ता क्रमांकानुसार धरण्यात येईल. विहित मुदतीनंतर नियुक्ती स्वीकारल्यास त्यांची ज्येष्ठता अबाधित राहणार नाही.

४.    श्रीमती चिमोटे ह्या सेवाप्रवेश नियमानुसार व सामान्य प्रशासन विभाग क्रमांक : मविप १४१४/प्र.क्र.१४९/१४-अ, दिनांक २.११.२०१५ च्या परिपत्रकानुसार सर्व अटींची पूर्तता करीत असल्याचे संबंधित विभागाने प्रमाणित केले आहे. यास्तव त्यांचे नियुक्तीचे आदेश निर्गमित करताना विभागाने त्याबाबतची खात्री करावी. त्यासाठी नियतवाटप करण्यात आलेल्या उमेदवाराचे आवेदनपत्र **सोबत** पाठविण्यात येत आहेत.

५.    सदरहू उमेदवारास सहायक कक्ष अधिकारी पदावरील पदस्थापना त्याचेविरुध्द कोणत्याही प्रकारची विभागीय चौकशी प्रलंबित नाही या धारणेच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

६.    हे आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१७०१०५१३१४४७३६०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration, postalCode=400032, st=Andhra Pradesh, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2017.01.05 13:18:49 +05'30'

**(ग.भि.गुरव)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

श्रीमती नि.ल. चिमोटे (नि.ब.कुलकर्णी) लिपिक-टंकलेखक, यांना कौशल्य विकास व उद्योजकता विभागामार्फत)

**प्रत,**

१) अ.मु.स./प्रधान सचिव/सचिव (आस्थापना), कौशल्य विकास व उद्योजकता विभाग/सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२. (संबंधित विभागामार्फत)

२) सह/उप सचिव (आस्थापना), कौशल्य विकास व उद्योजकता विभाग/सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

३) निवड नस्ती/संग्रहार्थ (साप्रवि/कार्यासन १४-अ)